**वैधमापन शास्त्र यंत्रणेतील २१० अस्थायी पदांना दिनांक १ मार्च, २०२० ते दिनांक ३१ ऑगस्ट, २०२० या कालावधीकरीता मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. :- वैमाशा-२०१६ / १८४ / प्र. क्र. ४० / ग्रासं-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, विस्तार,
मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०५ मार्च, २०२०

वाचा:- १) शासन निर्णय, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग क्रमांक संकीर्ण-१००३ /प्र.क्र. ४८३/नापु-१४, दिनांक २६/६/२००३
२) शासन निर्णय क्र -वैमाशा-२०१६ /१८४/प्र.क्र. ४०/ग्रासं-३ दिनांक १०/१०/२०१९,
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि- २०१६/प्र. क्र. ८/१६/ आ.पु.क. दिनांक १२/२/२०२०.

प्रस्तावना :-

या विभागाच्या अखत्यारितील विविध विभाग प्रमुखांच्या आस्थापनेवरील पदांच्या आढाव्याला उच्चस्तर समितीने अतिमत: मान्यता दिलेली आहे. त्यानुसार सुधारीत आकृतीबंध घोषित करण्याबाबत उपरोक्त १ येथील दिनांक २६/६/२००३ च्या शासन निर्णयान्वये सुधारित आकृतीबंधास मान्यता देण्यात आली आहे.

२. उपरोक्त २ येथील शासन निर्णयान्वये नियंत्रक, वैधमापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिपत्याखालील मुंबई आणि जिल्हा स्तरावरील आस्थापनेवर असलेल्या एकूण मंजूर ९४० पदांपैकी २१० अस्थायी पदांना दिनांक १/१०/२०१९ ते २९/२/२०२० या कालावधीकरीता मुदतवाढ देण्यात आली होती. सदर मुदतवाढ संपुष्टात येत आल्यामुळे त्यापुढील मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. यासंदर्भात शासनाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय :-

नियंत्रक, वैधमापन शास्त्र यांच्या आस्थापनेवरील या शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्र अ ” मध्ये दर्शविलेल्या एकूण २१० अस्थायी पदांना **दिनांक १/३/२०२० ते ३१/८/२०२० (सहा महिने) पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.**

यासाठी होणारा खर्च “मागणी क्रमांक, एम-३, मुख्य लेखाशीर्ष ३४७५, इतर सर्वसाधारण आर्थिक सेवा (१०६), वजन व मापे यांचे विनियमन (००) (०१) वजने व मापे विनियमन, (३४७५००९३)” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०२० - २०२१ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. पदनि २०१६ / प्र. क्र. ८/ १६/आ.पु.क. दिनांक १२/२/२०२० अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०२००३०५१२३२१२५१०६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHESHRAO BHASKAR KUTE

Digitally signed by SHESHRAO BHASKAR KUTE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=b83dd3164bf1a6f2c48a39007e78789c79c52e07ad200c3250d381947c40582e, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=b9e0c912bdfbc8224f1554ba0bc93342824e4faa118ed64c79ac40826e1611b3, ou=FOOD CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SHESHRAO BHASKAR KUTE
Date: 2020.03.05 12:34:43 +05'30'

**( शे. भा. कुटे )**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**सहपत्र**-वरीलप्रमाणे

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ ( लेखा व अनुज्ञयेता ), मुंबई / नागपूर
२) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ ( लेखा परिक्षा ), मुंबई / नागपूर
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
५) वित्त विभाग (व्यय-४/अर्थसंकल्प-१९/वित्तीय सुधारणा-१), मंत्रालय, मुंबई
६) नियंत्रक, वैधमापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) उपनियंत्रक, वैधमापन शास्त्र, पुणे, नागपुर, औरंगाबाद, नाशिक, अमरावती, कोकण, मुंबई महानगर विभाग, ( नियंत्रक, वैधमापन शास्त्र, मुंबई यांचे मार्फत )
८) वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई ( ३ प्रती )
९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१०) सर्व सहायक नियंत्रक, वैधमापन शास्त्र. मार्फत (नियंत्रक, वैधमापन शास्त्र, मुंबई.

## विवरणपत्र-अ

शासन निर्णय क्रमांक -**वैमाशा-२०१६/१८४/प्र. क्र. ४०/ ग्रासं-३ दिनांक ०५ मार्च, २०२०** अन्वये दिनांक १ मार्च, २०२० ते ३१ ऑगस्ट, २०२० पर्यंत पुढे चालू ठेवण्यात आलेली अस्थायी पदे.

| अ.क्र | पदनाम | पदे |
|---|---|---|
| १ | उपनियंत्रक वैधमापन शास्त्र | २ |
| २ | सहायक नियंत्रक, वैधमापन शास्त्र | ९ |
| ३ | स्वीय सहायक | १ |
| ४ | अधिक्षक | २ |
| ५ | निरीक्षक, वैधमापन शास्त्र (निवड श्रेणी) | १४ |
| ६ | निरीक्षक, वैधमापन शास्त्र ( निम्न श्रेणी ) | ४२ |
| ७ | वरिष्ठ लिपीक | २ |
| ८ | कनिष्ठ लिपीक | ११ |
| ९ | टंकलेखक | १ |
| १० | लिपीक-टंकलेखक | १ |
| ११ | प्रयोगशाळा सहायक | २ |
| १२ | क्षेत्र सहायक | ४५ |
| १३ | वाहनचालक | ९ |
| १४ | क्रेन चालक | २ |
| १५ | नाईक | २७ |
| १६ | शिपाई | ४० |
| | **एकूण** | **२१०** |